**महाराष्ट्र राज्यातील कोरोना विषाणू प्रसारावरील प्रतिबंधात्मक उपाय म्हणून लागू करण्यात आलेल्या लॉकडाऊनच्या कालावधीतील शासकीय कार्यालयातील उपस्थितीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : समय २०२०/प्र.क्र.३५/१८(र.वका.)**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०००३२
दिनांक : १८ एप्रिल, २०२०

वाचा:- :

१. शासन अधिसूचना, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : करोना-२०२० / प्र. क्र.५८ / आरोग्य-५, दिनांक १४ मार्च, २०२०,
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : समय-२०२० / प्र. क्र. ३५ /१८ (र.वका.), दिनांक १८ मार्च, २०२०,
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : समय-२०२० / प्र. क्र. ३५ /१८ (र.वका.), दिनांक २० मार्च, २०२०,
४.शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : समय-२०२० / प्र. क्र. ३५ /१८(र.वका.), दिनांक २३ मार्च, २०२०,
५. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : समय-२०२० / प्र. क्र. ३५ /१८(र.वका.), दिनांक ६ एप्रिल, २०२०,
६. शासन अधिसूचना, आपत्ती व्यवस्थापन व मदत व पुनवर्सन, क्रमांक :डीएमयू २०२०/सीआर ९२/डीआयएसएम-१, दिनांक १३ एप्रिल, २०२०,
७. केंद्रशासनाच्या गृह मंत्रालयाची अधिसूचना क्र. ४०-३/२०२०-डीएम-आय-(ए) दि. १५ एप्रिल,२०२०
८. शासन अधिसूचना, आपत्ती व्यवस्थापन व मदत व पुनवर्सन, क्रमांक :डीएमयू २०२०/सीआर ९२/डीआयएसएम-१, दिनांक १५ एप्रिल, २०२०.
९. शासन अधिसूचना, आपत्ती व्यवस्थापन व मदत व पुनवर्सन, क्रमांक :डीएमयू २०२०/सीआर ९२/डीआयएसएम-१, दिनांक १७ एप्रिल, २०२०.

**शासन निर्णय:-**

कोरोना विषाणूंचा (COVID-१९) प्रसार राज्यातील कार्यालयांमध्ये होऊ नये, तसेच राज्यातील अधिकारी/कर्मचारी यांना त्यांचा संसर्ग होऊ नये म्हणून विविध प्रतिबंधात्मक उपाययोजना **राबविण्याच्या दृष्टीने या विभागाच्या संदर्भाधीन २ ते ५ येथील शासन आदेशान्वये विविध सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत**.

तसेच आता उक्त क्रमांक ८ येथील अधिसूचनेन्वये सर्व राज्यातील लॉकडाऊनचा कालावधी दि. ३ मे, २०२० पर्यंत वाढविण्यात आलेला आहे.

२. उक्त संदर्भ क्र. ४ येथील दि. २३ मार्च, २०२० च्या शासन निर्णयान्वये शासकीय कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांची कार्यालयीन उपस्थिती ५ टक्के इतकी ठेवण्याबाबत सूचना देण्यात आल्या होत्या. आता, उक्त संदर्भ क्र. ८ येथील अधिसूचनेन्वये लॉकडाऊनचा कालावधी दि. ३ मे, २०२० पर्यंत वाढविण्यात आला असल्याची बाब विचारात घेऊन तसेच यासंदर्भात सर्वंकष विचार करुन राज्याच्या शासकीय कार्यालयातील उपस्थितीबाबत शासनाने खालीलप्रमाणे सुधारित निर्णय घेतले आहेत:-

अ)संपूर्ण राज्यातील शासकीय कार्यालयांमध्ये अधिकारी व कर्मचारी यांची उपस्थिती १० टक्के इतकी ठेवण्यात यावी. याअनुषंगाने रोटेशन पध्दतीने कार्यालयीन उपस्थिती निश्चित करण्यासाठी प्रत्येक मंत्रालयीन सचिव/संबंधित कार्यालयप्रमुख यांनी आवश्यक ती उपाययोजना करावी.

ब) तथापि मंत्रालयातील सर्व सह/उपसचिवांनी कार्यालयात उपस्थित रहाणे बंधनकारक राहील. यापैकी महिला अधिकाऱ्यांना कार्यालयीन उपस्थितीपासून सूट देण्याचे अधिकार संबंधित मंत्रालयीन सचिवांना/कार्यालयप्रमुखांना राहतील.

क) उपरोक्त “अ” व “ब” येथील उपस्थितीबाबतचे आदेश दि. २० एप्रिल २०२० पासून अंमलात येतील.

ड) उक्त आदेशाचा भंग करणारे अधिकारी/ कर्मचारी हे शिस्तभंगविषयक कार्यवाहीस पात्र राहतील.

इ) मंत्रालय उपहारगृह तात्काळ सुरु करण्यासाठी संबंधित कार्यासनाने यासंदर्भात तातडीने उचित कार्यवाही करावी.

फ) लॉकडाऊनच्या कालावधीमध्ये उपनगरीय रेल्वेसेवा पूर्णपणे बंद असल्याने बृहन्मुंबई येथील शासकीय कार्यालयातील तसेच मंत्रालयातील शासकीय अधिकारी / कर्मचारी यांनी त्यांच्या कार्यालयापर्यंतच्या प्रवासासाठी महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ (MSRTC) तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बससेवेचा (उदा.BEST/NMMT इ.)उपयोग करावा.

तसेच बृहन्मुंबई व्यतिरिक्त अन्य ठिकाणच्या कर्मचाऱ्यांनीही संबंधित प्राधिकरणाच्या उपलब्ध बससेवेचा उपयोग करावा.

ग) करोना विषाणूचा संसर्ग टाळण्यासाठी सोशल डिस्टन्सींग ठेवणे अत्यंत आवश्यक आहे. तथापि असे निदर्शनास आले आहे की, अत्यावशक सेवेतील कर्मचाऱ्यांसाठी उपलब्ध असलेल्या बसेसची संख्या पुरेशी नसल्याने त्यामध्ये अत्यंत गर्दी होत असल्याने कर्मचाऱ्यांना विषाणूंचा संसर्ग होण्याची शक्यता नाकारता येत नाही. परिणामी अनेक अधिकारी/ कर्मचारी कार्यालयात जाण्यास इच्छूक नसल्याचे दिसते. सबब या बसेसमधील प्रवाशांमध्ये उपलब्ध आसन व्यवस्थेपेक्षा अतिरिक्त प्रवासी घेतले जाणार नाहीत, याची संबंधित स्थानिक प्राधिकरण तसेच महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ (MSRTC) यांच्या प्रशासनाने उचित दक्षता घ्यावी. तसेच तशा सूचना सर्व संबंधितांना निर्गमित कराव्यात. याकरिता सकाळी ७ ते ११ या कालावधीत तसेच सायंकाळी ४ ते ७ या

कालावधीत पुरेशा संख्येने बसेसच्या सेवा उपलब्ध होतील याकरिता आवश्यक उपाययोजना करण्यात याव्यात.

ह) मंत्रालयातील अधिकारी / कर्मचारी यांची असलेली मोठी संख्या तसेच त्यांना दूरच्या ठिकाणावरुन करावा लागणारा प्रवास तसेच मुंबई उपनगरीय **रेल्वे** सेवेवरील त्यांची अवलंबितता या सर्व बाबी विचारात घेता महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास (MSRTC) याद्वारे आदेशित करण्यात येते की, त्यांनी सकाळी ७ ते ११ यावेळेमध्ये पश्चिम रेल्वे, मध्य रेल्वे, हार्बर या रेल्वेस्थानकांजवळून मंत्रालयापर्यंत (मधल्या विविध टप्पा / रेल्वे स्थानकावरील कर्मचाऱ्यांनाही घेऊन) त्याचप्रमाणे सायंकाळी ४ ते ७ यावेळेत मंत्रालयापासून उक्त स्थानकापर्यंत जाण्यासाठी विशेष व पुरेशा संख्येने बसेसच्या सेवा सुरु कराव्या. बसमधील गर्दी टाळण्याकरिता दोन बसेसमधील कालावधी जास्त असणार नाही याची दक्षता घ्यावी.

बृहन्मुंबई क्षेत्राकरिता BEST यांनी वरीलप्रमाणे विशेष बससेवा मंत्रालयीन अधिकारी / कर्मचारी यांच्यासाठी सुरु कराव्यात.

य) सदरच्या सूचना पुढील आदेशापर्यन्त लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०२००४२०१२३२३८५६०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Anshu Sinha

Digitally signed by Anshu Sinha
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a3a7504068b24f4e7eb0277456c1fe4e5d31e4d0b0fdc81eb8816e33c5735b5b, serialNumber=e71208cc885f6d3c01b374ed0921df256abda4ed94d69472deb566c39b4ee68c, cn=Anshu Sinha
Date: 2020.04.20 13:56:15 +05'30'

**( अन्शु सिन्हा )**
**सचिव ( प्र.सु.व.र.व.का )**

**प्रत :**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव (५ प्रती),
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
६. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव(५ प्रती), मंत्रालय, मुंबई ४०००३२.
७. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
८. सर्व मा.मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
९. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
१०. मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
११. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.

१२.प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
१३.प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
१४.प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय,
१५.सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१७.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१८. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
१९.राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई,
२०.सर्व विभागीय आयुक्त,
२१.आयुक्त, सर्व महानगर पालिका,
२२.व्यवस्थापकीय संचालक, BEST महामंडळ, मुंबई
२३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळ, मुंबई
२४.सर्व जिल्हाधिकारी,
२५.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२६.सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख / प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
२७.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती),
२८. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई ४०००२०.
२९.इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस(आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०००२५.
३०.नॅशनलीस्ट काँग्रेस पार्टी, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडीया मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई ४०००३८.
३१.शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८.
३२.बहुजन समाज पार्टी, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, प्लॉट नं. ८३-अे, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-४०००१४.
३३.भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई ४००००४.
३४.भारतीय कम्युनिस्ट(मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई ४०००१३.
३५.महाराष्ट्र नवनिर्माण सेवा, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४०००२८.
३६.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई ४०००३२
३७.निवड नस्ती (का.१८), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई४०००३२.